**शालेय शिक्षण व क्रीडा विभागाचे प्रधान सचिव व त्यांच्या कार्यालयासाठी दालन क्रमांक ४२४ च्या नूतनीकरणावर झालेल्या अतिरिक्त स्थापत्य कामाच्या खर्चाच्या अंदाजपत्रकास तसेच विद्युतीकरणाच्या सुधारित खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : नूतनी-२०२२/प्र.क्र.६/नोंदणी शाखा**
मंत्रालय (विस्तार), दालन क्र.४२१,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : २६ मे, २०२३

**वाचा** :-

१. वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनिमय, भाग-२ दिनांक १७ एप्रिल, २०१५ व दिनांक २०.०९.२०१९
२. कार्यकारी अभियंता, इलाखा शहर विभाग, सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई यांचे पत्र क्रमांक : इशवि/प्रशा/द./५१११, दिनांक १२.०५.२०२२
३. कार्यकारी अभियंता (विद्युत), दक्षिण मुंबई विद्युत विभाग, सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई यांचे पत्र क्रमांक : काअ/दमुंविवि/स्वीस/२०३७/२०२२, दिनांक ३०.५.२०२२
४. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र.नूतनी-२०२२/प्र.क्र.६/नोंदणी शाखा, दिनांक १३ जून, २०२२
५. कार्यकारी अभियंता (विद्युत), दक्षिण मुंबई विद्युत विभाग, सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई यांचे पत्र क्रमांक : काअ/दमुंविवि/स्वीस/८१६/२०२३, दिनांक ९.२.२०२३
६. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई यांचे पत्र क्रमांक : मुअ (मुं)/का-२/ ७५९/२०२३, दिनांक १०.२.२०२३

**शासन निर्णय :-**

शालेय शिक्षण व क्रीडा विभागाच्या सचिवांचे व त्यांच्या कार्यालयाचे दालन क्र.४२४ चे नूतनीकरण पूर्ण करण्यात आले आहे. सदर दालनाच्या नूतनीकरणापोटी वाचा येथे नमूद दि१३ जून, २०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये स्थापत्त्य कामासाठी रु.२८,२१,६४९/- व विद्युतीकरणाच्या कामासाठी रु.७,७७,२६१/- अशा एकूण रु.३५,९८,९१०/- इतक्या खर्चाच्या किंमतीस प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे.

२. दालन क्र.४२४ येथे वातानुकूलन यंत्रणा अगोदरपासून कार्यरत असल्याने, त्याची रक्कम कमी करण्याबाबत सा.बां.वि. (विद्युत) विभागास विनंती करण्यात आली होती. सदर बाब विचारात घेऊन, विद्युतीकरणापोटी झालेला खर्च कमी झाला आहे. मात्र, शासकीय कंत्राटासाठी वस्तू व सेवा कराबाबत १२ टक्के ऐवजी १८ टक्के अशी वाढ झाल्याने, कार्यकारी अभियंता (विद्युत), सा.बां.वि., मुंबई यांनी विद्युतीकरणाच्या व अनुषंगिक कामकाजास वाचा येथे नमूद दि.९/२/२०२३ रोजीच्या पत्रान्वये रु.६,४२,७२४/- या सुधारित रकमेस प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याची विनंती केली आहे.

| अ.क्र. | कामाचे नाव | सुधारित रक्कम |
|---|---|---|
| १. | Est.No.OW/MESD/MS/3802 of 2022-2023<br>Providing renovation of electrical installation with computer LAN, telephone wiring, fire sprinkler for office of Hon.Secretary, school Education Department in room no.424 at forth floor, Annex Bldg, Mantralaya, Mumbai | रु.६,४२,७२४/- |

शासन निर्णय, दि.१३ जून, २०२२ अन्वये विद्युतीकरण व अनुषंगिक कामापोटी नमूद करण्यात आलेल्या अंदाजपत्रकाची रक्कम रु.७,७७,२६१/- यामध्ये सुधारणा करण्यात येत असून, विद्युतीकरण व अनुषंगिक कामापोटी झालेला खर्च रु.६,४२,७२४/- (अक्षरी रुपये सहा लाख बेचाळीस हजार सातशे चोवीस) यास या शासन निर्णयान्वये सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

३. मा.प्रधान सचिव यांचे दालन क्र.४२४ च्या नूतनीकरणादरम्यान काही अतिरिक्त कामे करण्याबाबत सार्वजनिक बांधकाम विभागास सूचित करण्यात आले होते. त्या अनुषंगाने अधीक्षक अभियंता, मुंबई सा.बां.मंडळ, मुंबई यांचे मार्फत मुख्य अभियंता, सा.बां.वि. यांचेकडे अंदाजपत्रक तांत्रिक सहमती मिळणेसाठी सादर करण्यात आले होते. त्यासंदर्भात मुख्य अभियंता, सा.बां.वि., मुंबई यांनी वाचा येथे नमूद दि.१०.२.२०२३ रोजीच्या पत्रान्वये खालील कामास व किंमतीस तांत्रिक मान्यता प्रदान केली आहे.

| अ.क्र. | कामाचे नांव | अंदाजित किंमत |
|---|---|---|
| १. | Renovation of Pantry, Passage Area, UPVC Window & pergo of Room No.424 | रु.९,२६,९०४/- |

४. या शासन निर्णयान्वये, मंत्रालय विस्तार इमारतीमधील मा.प्रधान सचिव (शालेय शिक्षण व क्रीडा विभाग) व त्यांचे कार्यालयास वाटप करण्यात आलेले दालन क्रमांक ४२४ (विस्तार इमारत) या दालनाचे नूतनीकरण कामादरम्यान अतिरिक्त स्वरुपात झालेल्या स्थापत्य कामापोटी रु.९,२६,९०४/- (अक्षरी रूपये नऊ लाख सव्वीस हजार नऊशे चार फक्त) इतक्या रकमेस प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

५. या प्रयोजनार्थ येणारा खर्च " मागणी क्रमांक ई-४, ४२०२, शिक्षण, क्रीडा, कला व संस्कृती यावरील भांडवली खर्च, (०१) सर्वसाधारण शिक्षण, २०२ माध्यमिक शिक्षण, (००) (०४), शिक्षण उपसंचालक व शिक्षण विभागाच्या कार्यालय इमारतीचे बांधकाम, ४२०२६२२८ " या लेखाशीर्षाखाली सन २०२३-२४ या वित्तीय वर्षामध्ये उपलब्ध असलेल्या अर्थसंकल्पिय तरतूदीतून खर्ची टाकण्यात यावा.

६. शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनिमय, भाग-२ दिनांक १७ एप्रिल, २०१५ अन्वये वित्तीय अधिकार नियमपुस्तिका १९७८ मधील भाग एक उपविभाग पाच, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्रमांक १३४ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानूसार, तसेच वित्तीय अधिकार नियमपुस्तिका १९७८ भाग पहिला, उप विभाग-पाच, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तिका अंतर्गत परिच्छेंदाखालील प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारांमधील परिच्छेद क्रमांक १३४ (१), १३४ (२) आणि १३४ (३) मधील वित्तीय अधिकारांच्या वित्तीय मर्यादा व अटींमध्ये करण्यात आलेल्या सुधारणा विचारात घेऊन हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२३०५२६१५३५५३६१२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANTOSH BASAVESHWAR MAMADAPURE

Digitally signed by SANTOSH BASAVESHWAR MAMADAPURE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3bfe111652996d95372924b1d22cdf88b33dfa2a3de3d8ea011b7d83adc40cb6, pseudonym=EB81C64443B702FB77DC1591B2143DFF0994DDB2, serialNumber=557ABE7A7194EC5DDC74DF537D7D57A9DBDA20B1937A2E41983C35F6A38B6AD8, cn=SANTOSH BASAVESHWAR MAMADAPURE
Date: 2023.05.26 15:39:13 +05'30'

**( संतोष ममदापुरे )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१. मा. मंत्री शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. कार्यकारी अभियंता, इलाखा शहर विभाग, सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई
३. कार्यकारी अभियंता, दक्षिण मुंबई विद्युत विभाग, सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई
४. महालेखापाल, १ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई
५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
६. वित्त विभाग/व्यय-५/अर्थ-८, मंत्रालय, मुंबई
७. लेखाशाखा, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
८. सर्व कार्यासने, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
९. निवड नस्ती (नोंदणी शाखा).